**स्थानिक स्वराज्य संस्थेतंर्गत गडचिरोली व गोंदिया येथील बंगाली माध्यमाच्या प्राथमिक शाळांमध्ये शिक्षण सेवकांची नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकिर्ण-२०१६/(प्र.क्र.१३५ )/टिएनटी-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-०६ डिसेंबर, २०१६

वाचा:-

१. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक पीआरई-२००६/(४७६७) /प्राशि-१ दिनांक १६.१२.२००९
२. शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक आरटीई-२०१०/प्र.क्र.५७२/प्राशि-१ दिनांक १३.०२.२०१३

प्रस्तावना:-

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थातंर्गत प्राथमिक शाळांमधील शिक्षण सेवक भरती प्रक्रीया संदर्भाधीन दिनांक १६.१२.२००९ च्या शासन निर्णयान्वये केंद्रीय भरतीपूर्व निवड चाचणी प्रक्रीयेद्वारे करण्यात आलेली आहे. त्यानुसार दिनांक ०२.०५.२०१० मध्ये केंद्रीय भरतीपूर्व चाचणी परीक्षा घेण्यात आली.

गडचिरोली व गोंदिया या जिल्ह्यांमध्ये बंगाली माध्यमाच्या शाळांमधील शिक्षकांची सेवानिवृत्तीमुळे रिक्त झालेली पदे भरण्यासाठी बंगाली भाषा घेवून विहित अर्हता उत्तीर्ण असलेले उमेदवार वरील केंद्रीय भरतीपूर्व निवड चाचणीद्वारे उपलब्ध झाले नाहीत.

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ नुसार प्रत्येक बालकांस त्याचे मुळ भाषेत शिक्षण घेण्याचा हक्क आहे. आणि त्यासाठी आवश्यक सुविधा उपलब्धता करुन देण्याची जबाबदारी शासनाची आहे.

बंगाली विषय घेवून १२ वी झालेल्या व इतर माध्यमांत डी.एड अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या उमेदवारांना बंगाली माध्यमाच्या शाळांमध्ये नियुक्ती देण्याबाबतच्या सूचना यापूर्वी सन २००६ मध्ये देण्यात आलेल्या होत्या. आता राष्ट्रीय शिक्षक शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिनांक २३.०८.२०१० व दिनांक २९.०७.२०११ च्या अधिसूचनान्वये शैक्षणिक व व्यावसायिक अर्हता निश्चित केलेली असून इयत्ता १ ली ते ८ वी प्राथमिक शाळेत शिक्षक म्हणून नियुक्त होणाऱ्या उमेदवारास शिक्षक पात्रता परीक्षा (टीईटी) अनिवार्य केलेली आहे.

गोंदिया व गडचिरोली जिल्ह्यात बंगाली माध्यमाच्या प्राथमिक शाळेमध्ये शिक्षकांची रिक्त असलेली पदे व केंद्रीय भरतीपूर्व परीक्षेद्वारे बंगाली भाषिक पात्र उमेदवार उपलब्ध होवू न शकल्याने तसेच बंगाली माध्यमात आरक्षित प्रवर्गातील शिक्षक पदासाठी उमेदवार मिळण्याची कमी शक्यता या सर्व बाबी विचारात घेता बंगाली माध्यमाच्या प्राथमिक शाळेतील शिक्षकांची रिक्त पदे सरळसेवेने भरण्याकरीता स्वतंत्र भरती प्रक्रीया राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राज्यातील गडचिरोली व गोंदिया जिल्ह्यातील स्थानिक स्वराज्य संस्थेतंर्गत बंगाली माध्यमाच्या प्राथमिक शाळेतील शिक्षकांच्या रिक्त असलेल्या पदावर शिक्षण सेवक म्हणून सरळसेवेने उमेदवार उपलब्ध करुन देण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यपध्दती विशेष बाब म्हणून अनुसरण्यास शासन याद्वारे सहमती देत आहे.

अ) बंगाली माध्यमाच्या प्राथमिक शाळेतील शिक्षकांची रिक्त पदे बंगाली भाषिक उमेदवारांमधून भरण्याकरिता शिक्षक पात्रता परीक्षा आयोजित करण्यात यावी.

ब) सदर पात्रता परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या उमदेवारांची निवड मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अध्यक्षेतखालील समितीमार्फत करण्यात यावी.

२. सदर शिक्षक पात्रता परीक्षेकरीता कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील :-

१) इयत्ता ६ वी ते ८ वी हिंदी माध्यमातील प्रथम भाषा बंगाली शिकविण्यासाठी शिक्षकांची पदे बंगाली भाषिक पदवीधर शिक्षक, जे अन्य माध्यमाच्या शाळांमध्ये कार्यरत आहेत, त्यांच्या सेवाज्येष्ठता व इच्छेनुसार विकल्प घेवून समायोजनेद्वारे प्रथमत: भरण्यात यावीत. सदर बंगाली शिक्षक हा पदवीधारक व इयत्ता १२ वी मध्ये नियमित बंगाली विषय घेवून परीक्षा उत्तीर्ण झालेला असावा.

२) तद्नंतर, सन २०१५-१६ च्या संचमान्यते अखेर रिक्त असणाऱ्या व माहे ३१ मे, २०१७ अखेर रिक्त होणाऱ्या बंगाली माध्यमाच्या प्राथमिक शाळांतील शिक्षकांच्या पदांची संख्या गडचिरोली व गोंदिया जिल्ह्याच्या शिक्षणाधिकारी (प्राथमिक) यांनी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना उपलब्ध करुन द्यावी. तसेच रिक्त पदांची माहिती आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे व शासनास कळविण्यात यावी.

३) सदर परीक्षा आयोजनाची जबाबदारी महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे यांच्यावर सोपविण्यात येत आहे. ही परीक्षा माहे जानेवारी, २०१७ मध्ये आयोजित करण्याच्या दृष्टीने अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे यांनी तात्काळ कार्यवाही सुरु करावी.

४) शिक्षक पात्रता परीक्षेच्या आयोजनाबाबत अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद यांनी ठरवून दिलेल्या वेळापत्रकानुसार संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यांचे मार्फत जिल्ह्यात सर्वाधिक खपाच्या दोन वृत्तपत्रात जाहिरात प्रसिध्द करावी. जाहिरात प्रसिध्द झाल्यापासून उमेदवारांस अर्ज सादर करण्यास ३० दिवसांची मुदत राहील. उमेदवारांकडून मागवावयाच्या अर्जाचा विहित नमुना महाराष्ट्र राज्य, परीक्षा परिषदेने संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना उपलब्ध करुन द्यावा.

५) शिक्षण सेवकासाठी किमान वयोमर्यादा खुल्या प्रवर्गातील उमेदवारासाठी १८ वर्षे व कमाल वयोमर्यादा ३८ वर्षे अशी राहील. मागासवर्गीयासाठी कमाल ४३ वर्ष अशी राहील. ( सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.४०४/कार्या-१२, दि.२५

एप्रिल,२०१६ नुसार ) सरळसेवेन भरतीकरिता सामान्य प्रशासन विभागामार्फत वेळोवेळी विहीत करण्यात येणारी वयोमर्यादा शिक्षण सेवकांना आपोआप लागू होईल.

६) संबंधित उमेदवारांनी अर्ज पुर्ण भरुन अर्ज व अर्जासोबत विहित परीक्षा शुल्कासह संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हापरिषद यांच्याकडे विहित मुदतीत नोंदणीकृत डाकेने पाठवावी अथवा प्रत्यक्षात कार्यालयात जमा करावी.

७) शिक्षक पात्रता परीक्षा मध्ये कनिष्ठ प्राथमिक ( इ. १ ते ५ वी ) व वरीष्ठ प्राथमिक ( इ. ६ ते ८ वी ) या दोन्ही गटातील शिक्षकांसाठी प्रत्येकी एक स्वतंत्र प्रश्नपत्रिका राहतील. दोन्ही गटासाठी अर्ज करणाऱ्या उमेदवारास दोन्ही प्रश्नपत्रिका सोडविणे आवश्यक राहील.

८) या दोन्ही प्रश्नपत्रिकेचे स्वरुप व काठिण्य पातळी अनुक्रमे माध्यमिक व उच्च माध्यमिक अभ्यासक्रमावर आधारित राहील.

९) शासन निर्णय दि. १३.२.२०१३ अन्वये शिक्षकांसाठी निश्चित करण्यात आलेली किमान शैक्षणिक व व्यवसायिक अर्हता धारण करणाऱ्या किंवा अंतिम वर्षात प्रवेश घेतलेले उमेदवारास या परीक्षांना बसण्याची मुभा राहील.

१०) या पात्रता परीक्षेमध्ये किमान ३५ टक्के गुण प्राप्त करणाऱ्या उमेदवारास उत्तीर्ण समजण्यात येईल.

११) बंगाली माध्यमाच्या उमेदवाराची निवड गुणवतेनुसार शैक्षिणिक अर्हतासाठी ठरवून दिलेले गुण व शिक्षक पात्रता परीक्षेद्वारे प्राप्त गुण याद्वारे करण्यात यावी. केंद्रीय भरतीपूर्व परीक्षेत उत्तीर्ण होण्यापासून या उमेदवारांना सूट देण्यात येत आहे.

१२) सदर परीक्षेकरिता नमूना प्रश्नपत्रिका संच तयार करुन देणे, प्रश्नपत्रिका तपासणे व परीक्षेचा निकाल संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांना उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषदेची राहील. परीक्षेचा जिल्हानिहाय निकाल प्रसिध्द करण्याची जबाबदारी अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे यांची राहील.

१३) परीक्षेचे संभाव्य वेळापत्रक अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे यांचे मार्फत जाहीर करण्यात येईल. दोन्ही जिल्ह्यात परीक्षा एकाच दिवशी घेण्याकरिता संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी नियोजन करावे.

१४) परीक्षेचे माध्यम व अभ्यासक्रम : परीक्षेचे माध्यम बंगाली असेल.

१५) सदर परीक्षा ही एकूण १५० गुणांची राहील. परीक्षेसाठी वेळ २ तास राहील

१६) परीक्षा शुल्क : सदर परीक्षेकरिता शुल्क खालीलप्रमाणे राहील :-

खुला प्रवर्ग :- रु. ५००/-

मागासवर्गीय प्रवर्ग :- ( अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, भटक्या विमुक्त जाती/ जमाती, विशेष मागास प्रवर्ग, इतर मागासवर्ग आणि अपंग या प्रवर्गासाठी ) रु. २५०/-

३. प्राथमिक शिक्षण सेवक पदासाठी निवड करण्याकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया/ गडचिरोली यांचे अध्यक्षतेखाली संबंधित जिल्ह्यातील पदाधिकांऱ्यांची खालीलप्रमाणे निवड समिती राहील.

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया/ गडचिरोली - अध्यक्ष
२) समाज कल्याण अधिकारी जिल्हा परिषद - सदस्य
३) शिक्षणाधिकारी (माध्यमिक व उच्च माध्यमिक) - सदस्य
४) शिक्षणाधिकारी (प्राथमिक) - सदस्य सचिव

४. सदर निवड समिती प्राथमिक शिक्षण सेवक पदासाठी उमेदवाराची निवड शिक्षक पात्रता परीक्षेतील गुणांबरोबरच अन्य खालील बाबी विचारात घेवून गुणभारावर आधारित उच्चतम गुणांनुसार करील.

| अ.क्र. | बाब | गुणभार |
|---|---|---|
| १. | मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद यांच्यामार्फत आयोजित शिक्षक पात्रता परीक्षेतील गुण. | ७० टक्के |
| २. | इ.१२ वी परीक्षेतील गुण | १० टक्के |
| ३. | इ. १० वी परीक्षेतील गुण | १० टक्के |
| ४. | डी.एड. अभ्यासक्रमाच्या लेखी परीक्षेतील गुण | १० टक्के |
| | | **एकूण - १०० टक्के** |

५. परीक्षेचे आयोजनावर गैरप्रकार किंवा तांत्रिक / प्रशासकीय चूका झाल्यास त्याबद्दल फौजदारीसह सर्व कारवाई संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याविरुध्द करण्यात येईल. नियंत्रणात तांत्रिक व प्रशासकिय चुका झाल्यास अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे यांना जबाबदार धरण्यात येईल.

६. शिक्षण सेवकाच्या निवडीच्या अनुषंगाने न्यायालयीन प्रकरणे उपस्थित झाल्यास त्याचे परिक्षेत्र महाराष्ट्र राज्य राहील. शिक्षक पात्रता परीक्षा प्रक्रियेवर मुख्य नियत्रंक अधिकारी म्हणून संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे असतील. परीक्षेचे आयोजन, परीक्षेचा निकाल, शिक्षण सेवकाची निवड इत्यादी संदर्भात न्यायालयीन प्रकरणे उपस्थित झाल्यास संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी हाताळतील तर परीक्षेच्या प्रश्न पत्रिकेतील त्रुटी, उत्तर पत्रिकेचे मुल्यमापन इत्यादीसंदर्भात न्यायालयीन प्रकरणे उपस्थित झाल्यास आयुक्त, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०६१५४१०४४३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2017.03.23 16:18:37 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई.
३. मा. मंत्री शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव ( सर्व ).
५. मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व).
६. मा. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य विधानभवन, मुंबई/ नागपूर.
७. मा. मुख्य सचिवा यांचे स्वीय सहायक.
८. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांच स्वीय सहायक.
९. जिल्हाधिकारी, गडचिरोली /गोंदिया.
१०. शिक्षण संचालक ( प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. संचालक, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली / गोंदिया.
१४. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर.
१५. शिक्षणाधिकारी अधिकारी (प्राथमिक/माध्यमिक ), जिल्हा परिषद, गडचिरोली / गोंदिया.
१६. समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली/ गोंदिया.
१७. निवड नस्ती / टीएनटी-१.